“मोदी आवास” घरकुल योजनेतंर्गत
निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : मोआयो-२०२४/प्र.क्र.२४/योजना-५**
नवीन प्रशासकीय इमारत, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २८ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ :-**

१. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.वगृयो-२०२३/प्र.क्र.३३/योजना-५, दि.२८.०७.२०२३.
२. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.वगृयो-२०२३/प्र.क्र.३३/योजना-५, दि.२७.०९.२०२३.
३. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.वगृयो-२०२३/प्र.क्र.३३/योजना-५, दि.३०.०१.२०२४.
४. शासन ज्ञापन, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.वगृयो-२०२३/प्र.क्र.४४/योजना-५, दि.०५.१०.२०२३.
५. शासन ज्ञापन, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.वगृयो-२०२३/प्र.क्र.४४/योजना-५, दि.२०.०२.२०२४.
६. शासन ज्ञापन, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.वगृयो-२०२३/प्र.क्र.९४/योजना-५, दि.२१.०३.२०२४.
७. शासन ज्ञापन, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.वगृयो-२०२३/प्र.क्र.४४/योजना-५, दि.३१.०३.२०२४.
८. शासन ज्ञापन, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.मोआयो-२०२४/प्र.क्र.२४/योजना-५, दि.१२.०६.२०२४.
९. शासन ज्ञापन इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.मोआयो-२०२४/प्र.क्र.२४/योजना-५, दि.०९.०८.२०२४.

**शासन ज्ञापन :-**

“मोदी आवास” घरकुल योजनेतंर्गत सन २०२३-२४ ते सन २०२५-२६ या तीन वर्षात १० लाख घरे बांधण्याचे नियोजित आहे. त्यानुसार सन २०२३-२४ या वर्षाकरीता ३ लाख घरकुलांचे उद्दिष्ट राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण यांना देण्यात आले असून त्याकरीता एकूण रु.३७८८,५९,९३,६००/- (अक्षरी रु. तीन हजार सातशे अठ्ठयांऐंशी कोटी एकोणसाठ लक्ष त्र्याण्णव हजार सहाशे फक्त) इतक्या निधीची आवश्यकता आहे. त्यानुसार संदर्भ क्र. ४ ते ९ येथील शासन ज्ञापनान्वये एकूण रु.१२६०,००,००,०००/- (अक्षरी रु. एक हजार दोनशे साठ कोटी फक्त) इतका निधी संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई यांना वितरीत करण्यात आला असून उर्वरित निधी उपलब्धतेनुसार देण्यात येणार आहे.

२. आता, “मोदी आवास” घरकुल योजनेतंर्गत एकूण रु.४०,००,००,०००/- (अक्षरी रुपये चाळीस कोटी फक्त) इतका निधी संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई यांना वितरीत करण्यास या ज्ञापनान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरहू निधी वितरीत करण्यासाठी उप सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” तसेच संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. याबाबतचा खर्च “मागणी क्र.झेडजी-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्गीय व अल्पसंख्याक यांचे कल्याण, ०३, मागासवर्गीयांचे कल्याण, १०२, आर्थिक विकास, (०१), विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग, व विशेष मागास प्रवर्ग यांचे कल्याण, (०१) (१२) इतर मागासवर्गीय लाभार्थ्यांसाठी मोदी आवास घरकुल योजना (२२२५ एफ ७८२) (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०२४-२५ करीता प्राप्त आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा. सदर शासन ज्ञापनान्वये वितरीत करण्यात येणारे सहायक अनुदान (वेतनेत्तर ) हे सशर्त सहायक अनुदान आहे.

५. वित्तीय नियमावली व महाराष्ट्र अर्थ नियमावली पुस्तिकानुसार वित्त विभागाने निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करताना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्याची, तसेच सदर निधी खर्च केल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation Certificate) वेळोवेळी महालेखापाल, शासन व संबंधितांना सादर करण्याची जबाबदारी ही संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई यांची राहील.

६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८२८१५३४०८१४३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUDHAKAR SHAHAJI YADAV

Digitally signed by SUDHAKAR SHAHAJI YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=3e782c1e59acd749fc48c691d7a8c477d6ac39c1904204f442b52d728d48a67a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A576ADA378C3E1DDFF427C2BC46B5A5C32BC32EF80F7A475ABFA122778AAAD72, cn=SUDHAKAR SHAHAJI YADAV
Date: 2024.08.28 15:49:34 +05'30'

**(सु. श. यादव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण कक्ष, सिडको भवन, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई.

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. स्थानिक निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक
७. अपर मुख्य सचिव, ग्राम विकास  विभाग यांचे स्वीय सहायक
८. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे
९. सर्व जिल्हाधिकारी
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
११. उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सर्व प्रादेशिक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग.
१३. सर्व सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण.
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१५. सर्व सह सचिव/उप सचिव / अवर सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय,मुंबई.
१६. वित्त विभाग (व्यय-१४/अर्थसंकल्प-५), मंत्रालय,मुंबई
१७. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/ कार्यासन-१४१३), मंत्रालय, मुंबई.
१८. सर्व कार्यासने, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवड नस्ती (योजना-५)